

# भारतरत्नमंजूषा.

## वनपर्व.

हें पुस्तक

रा. रा. पांडुरंग प्रभाकर जोशी, बी. ए.,

यांनीं लिहिलें

व

गणपतराव काशीनाथ अँण्ड् सन्,
सेकन्डहॅन्ड् अण्ड् न्यू बुक्सेलर्स अण्ड् पब्लिशर्स,
यांनीं प्रकाशित केलें.
ठि. फणसवाडी जगन्नाथाची चाळ, पोस्ट काळबादेवी,–मुंबई.

हरजीवन भगवान यांनीं धर्मविजय छापखाना, मुंबई. पायधोणी नं. ५७२
येथें छापिलें.



प्रथमावृत्ति. प्रत ३०००.

सन १९१२ किंमत १२ आणे. संवत १९६८




# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ११ | २१ | हृदय | हृदयं |
| १४ | ३ | ध्यायंतभर्ज्जुनं | ध्यायंतमर्ज्जुनं |
| ,, | २१ | नस्ति | नास्ति |
| १९ | १२ | कैरातीयम्। | किरातीयम्। |
| २९ | १ | यस्त्वया | यस्त्वयाद्य |
| ३१ | ८ | यदस्त्र | यदस्त्रं |
| ,, | ९ | तदस्त्रं | तदस्त्रं |
| ,, | १८ | त्र्यंवक | त्र्यंबक |
| ३३ | १७ | चन्मह्यं | चेन्मह्यं |
| ३४ | १० | रण | रणे |
| ३६ | ३ | त्र्यवकेण | त्र्यंबकेण |
| ४० | १३ | स्वय | स्वयं |
| ५८ | ६ | निर्विचेष्ट | निर्विचेष्टं |
| ५९ | १५ | शून्य | शून्यं |
| ७४ | १२ | कार्तयिष्यंति | कीर्तयिष्यंति |
| ७७ | १२ | तताऽहं | ततोऽहं |
| ७८ | ३ | परिशक्तिुं | परिशंकितुं |
| ८० | १४ | तद्रां | तंद्रां |
| ८१ | २२ | ववष | ववर्ष |
| ८४ | १३ | प्रयतिष्य | प्रयतिष्ये |
| ८६ | १४ | कदुकेन | कंदुकेन |

| | | | |
|---|---|---|---|
| ९४ | ७ | अथिगच्छतु | अधिगच्छतु |
| ,, | १२ | मयाटत्येह | मयाटंत्येह |
| ,, | ,, | दृष्ट | दृष्टं |
| ९६ | १ | अब्रतां | अब्रूतां |
| ,, | १२ | त्व | त्वं |
| ९८ | २० | देमानां | देवानां |
| १०० | ७ | दिव्र | दिवं |
| १०२ | १ | श्येनकापोतीयम्। | श्येनक० |
| ,, | २२ | समासाध | समासाद्य |
| १०३ | १७ | जीघंति | जीवंति |
| ,, | १८ | दुस्त्वजे | दुस्त्यजे |
| १०७ | १९ | मह | महा |
| ११८ | ३ | पर्ति | पाति |
| ११९ | १४ | ह्मवध्या | ह्यवध्या |

**सूचना**–पुस्तक वाचण्यास सुरुवात करण्यापूर्वी विद्यार्थ्यांनीं वरील शुद्धिपत्राप्रमाणें चुक्या दुरुस्त करून द्याव्या.

मुंबई,<br>
५ जुलै १९१२ } **पां. प्र. जोशी.**



# प्रस्तावना.

यथा समुद्रो भगवान् यथा हि हिमवान् गिरिः ।
ख्यातावुभौ रत्ननिधी तथा भारतमुच्यते ॥

गेल्या वर्षीच्या उन्हाळ्यांत करमणुकीखातर '**महाभारत**' वाचीत असतां त्यांत कित्येक स्थळें फारच हृदयंगम व रसाळ अशीं आढळलीं--किंबहुना महाभारतांत असे प्रसंग पदोपदीं आढळतात असें म्हटलें, तरी चालेल. या प्रसंगां पैकीं कांहीं सुरस कथानकें निवडून काढून तीं संकलित केल्यास ते वेंचे इंग्रजी शाळांतून संस्कृताचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांस फार उपयोगी पडतील, असें वाटल्यावरून फक्त वनपर्वांतील कांहीं कथारत्नें एकत्र करून, ही **मंजूषा** तयार केली आहे यावरून वनपर्वांत सुंदर व मनोहर प्रसंग काय ते इतकेच, असें कोणीं समजूं नये. आरंभीं दिलेल्या श्लोकांत सौति नामक प्रख्यात पुराणिकानें म्हटल्याप्रमाणें '**महाभारत**' हा ग्रंथ रत्ननिधि आहे. त्यांत आजपर्यंत शेंकडों पाणवुड्यांनीं वुड्या मारून नवीं नवीं पाणीदार मोत्यें बाहेर काढलीं आहेत. तशापैकींच हा एक अल्पसा प्रयत्न आहे. कित्येक मनोहर आख्यानें नाइलाजास्तव बाजूला ठेवावीं लागलीं. मध्यम स्थितींतील कोणाही विद्यार्थ्यांस पुस्तक विकत घेण्यास जड जाऊं नये, अशा बेतानें स्वल्प किंमत ठेवण्याचा कृतसंकल्प असल्याकारणानें पुस्तकाची पृष्ठसंख्या नियमित करणें भाग पडलें. तथापि, प्रस्तुत पुस्तकांत ग्रथित केलेलीं आख्यानें स्वतंत्रपणें वाचणाऱ्या विद्यार्थ्यांस एका सहामाहीस सहज पुरावींत, अशी योजना केली आहे.

संस्कृत वाङ्मयांतील निवडक उताऱ्यांचीं दुसरीं बरींच पुस्तकें असतां, हें नवीन नुसत्या भारतीय आख्यानांचें पुस्तक कशाला पाहिजे ? अशी शंका कित्येकांस येईल. त्यावर आमचें एवढेंच उत्तर आहे कीं आजपर्यंत प्रचलित असलेलीं पुस्तकें ज्याप्रमाणें आपआपल्यापरी विद्यार्थ्यांस कमी जास्त उपयोगी पडलीं, त्याप्रमाणेंच आमची 'मंजूषा' ही पडेल. ज्ञानप्रसाराच्या साधनांचा कोणीं कोणास मक्ता दिलेला नाहीं. पुस्तकांच्या संख्येंत व तऱ्हेंत जितकी भर पडेल तितकी थोडीच आहे, अर्थातच चांगलीं पुस्तकें असतील, तेवढींच फार दिवस टिकतात; भिकार व टाकाऊ असतील, तीं तावडतोब नामशेष होतात. शिवाय, प्रस्तुत पुस्तक प्रसिद्ध करण्याचें दुसरें कारण असें कीं **महाभारतां**तील भाषेइतकी सुंदर संस्कृत भाषा इतरत्र क्वचितच सांपडेल. सरळ, सुगम व साधी असूनही, सुरस, जोरदार व ओजस्वी, अशी संस्कृत भाषा भारतांतच वाचावी. रूपावलि, समासचक्र पढलेल्या किंवा चवथ्यापांचव्या इयत्तेचें संस्कृत शिकलेल्या विद्यार्थ्यांस भेडसाऊन सोडील, इतकी भारतीय भाषा कठीण नाहीं; किंवा त्यापेक्षां प्रौढ विद्यार्थ्यांस कंटाळा आणील, इतकी ती सोपी किंवा पोरकटही नाहीं. भारतभाषामृततरंगिणीच्या संथ व गंभीर प्रवाहांत आबालवृद्धांनीं खुशाल पोहावें. त्या भाषेंत तरुण वाचकास चटका लावण्याचें जसें सामर्थ्य आहे, तसेंच प्रौढांचें मन तल्लीन करून सोडण्याइतकें गांभीर्य व सौरस्यही आहे. लहान मुलांनां वाचण्यासारखे पंचतंत्र, हितोपदेश व कथासरित्सागर हे ग्रंथ उत्कृष्ट आहेत. त्यांची भाषा सुगम व चटकदार आहे व गोष्टीही बोधप्रद आहेत. तथापि, नीतिशिक्षणाच्या दृष्टीनें भारतीय कथांची योग्यता पंचतंत्रादिकांतील गोष्टींपेक्षां शतपट अधिक आहे. पंचतंत्रांतील गोष्टी ह्या

कल्पित कथा आहेत; व **भारत** हा ग्रंथ जिवंत–हाडामांसानीं बनलेल्या–माणसांचा इतिहास आहे. कांहीं 'चिकित्सक' लोक **भारताला** कल्पित कादंबरी ठरवोत; परंतु आमच्या समाजाच्या हाडींमाशीं खिळलेल्या व सर्व अंगभर खेळेलेल्या पूर्वसंस्कारानुरूप, धर्मभीमादि भारतीय मंडळी ही खरेखुरे ऐतिहासिक पुरुष व आमचे पूज्यतम पूर्वज होत, ही समजूत हल्लींच्या अश्रद्धामय वातावरणांतही आमच्या मुलांच्या अंतःकरणांत कायम राहिलेली आहे. यामुळें **महाभारताच्या** प्रत्येक गोष्टींत जो जिवंतपणा भरलेला आहे, तो कुत्र्यामांजरांच्या गोष्टींत उतरणें शक्य नाहीं. भीष्माची पितृभक्ति, धर्माची सत्यनिष्ठा, द्रौपदीची तेजस्विता, सावित्रीचें पातिव्रत्य, अभिमन्यूचा पराक्रम, कर्णाचें दानशूरत्व इत्यादि भारतीय स्त्रीपुरुषांची उदात्त उदाहरणें नीतिशिक्षणाचे जे धडे मुलांच्या कोंवळ्या अंतःकरणांत बिंबवितील, तेच धडे तितक्याच स्पष्टपणें मुलांस शिकवण्याचें सामर्थ्य गंगदत्त बेडकाच्या अथवा जरद्गव गिधाडाच्या गोष्टींत असेल काय ? वास्तव भाषेच्या काय, किंवा नीतिशिक्षणाच्या काय, कोणत्याही दृष्टीनें **भारतांतील** आख्यानांचें वाचन हें मुलांस अधिक बोधप्रद व मनोरंजक झाल्यावांचून राहणार नाहीं, असें आम्हांस वाटतें.

प्रस्तुत पुस्तकांत कठीण शब्दांवर दिलेल्या टीपा आजपर्यंतच्या चालू वहिवाटीस अनुसरून इंग्रजींत न देतां शुद्ध मराठींत–महाराष्ट्रीय मुलांच्या जन्मभाषेंत–दिल्या आहेत. इंग्रेजी शाळेंत संस्कृत शिकणाऱ्या मुलांसाठीं मराठी टीपा दिलेलें पुस्तक काढलेलें पाहून जुन्या पद्धतीच्या दुराभिमानांत मुरलेल्या कांहीं लोकांस हसूं येईल ! परंतु, गेल्या दहा वर्षांत प्रचलित शिक्षणपद्धतींत लोकमतांत जी प्रचंड विचारक्रांति घडून आली आहे, तिचें ज्यानें

वरवर तरी निरीक्षण केलें असेल, त्यास आमच्या **मराठी टीपा** पाहून चुकल्याचुकल्या सारखें खास वाटणार नाहीं. लहान मुलांस संस्कृत व खुद्द मराठी या भाषा इंग्रेजीसारख्या अपरिचित भाषेच्या द्वारें शिकविण्याचा निसर्गविरुद्ध क्रम गेलीं ९० वर्षे झाला तेवढा बस्स आहे. यापुढें तरी संस्कृत भाषा मराठीच्या द्वारें शिकविण्याचा उपक्रम होणें अत्यंत अगत्याचें झालें आहे. ज्यांचे इंग्रजीचें ज्ञान जेमतेम ३।४ शब्दांचीं वाक्यें समजण्यापलीकडे नाहीं, त्या इंग्रजी ४ थ्या इयत्तेच्या मुलांकडून 'Final *Visarga* preceded by अ and followed by अ &c.' असले, वस्तुतः साधे व सोपे असलेले, परंतु इंग्रजी भाषेच्या पोषाखामुळें अवजड व भयंकर वाटणारे, व्याकरणाचे नियम पोपटासारखे पाठ म्हणवून घेण्यांत कोणा संस्कृत शिक्षकास भूषण वाटत असेल, तें असो ! आम्हांस तरी हा निव्वळ जुलूम वाटतो. या विषयासंबंधें गेल्या १०।१९ वर्षांत वरीच चर्चा झाली असून ती अगदींच फुकट गेली, असे म्हणतां येत नाहीं. आपल्या इलाख्याचे सध्यांचे अधिपति **सर जॉर्ज क्लार्क** यांच्या कारकीर्दींत दुय्यम शिक्षण क्रमाच्या बाबतींत ज्या कित्येक सुधारणा घडून आल्या, त्यांत शाळेंतील शिक्षणक्रमापैकीं कांहीं विषय मुलांच्या जन्मभाषेंत शिकविण्याची परवानगी मिळाली— इतकेंच नव्हे, तर परीक्षेंतील प्रश्नांचीं उत्तरेंही जन्मभाषेंत लिहिण्याची मुभा मिळाली—ही एक फारच महत्वाची सुधारणा होय. अर्थातच ही सुधारणा अद्यापि ( सरकारी ) 'स्कूलफायनल' परीक्षेपुरतीच आहे. मुंबई युनिव्हर्सिटीला ती अद्यापि मान्य झालेली दिसत नाहीं. पण या बाबतींत सरकारनें घालून दिलेला कित्ता आमची पुराण प्रिय युनिव्हर्सिटीही लवकरच गिरवील, असा रंग दिसत आहे. चांगल्या सुधारणेच्या बाबतींत सरकारचेंच काय पण कोणाचेंही

अनुकरण करण्यांत मोठी मानहानि आहे, असें नाहीं ! असो सरकारच्या या बदल-लेल्या धोरणांत संस्कृत मराठींतून शिकविण्याची व संस्कृताची परीक्षाही मराठीं-तून घेण्याची सवलत मिळालेली आहे; व या महत्वाच्या सवलतीबद्दल संस्कृत भाषेचे सर्व पुरस्कर्ते व हितेच्छु सर जार्ज यांचे मनःपुरःसर आभार मानल्या वांचून राहणार नाहींत. या सवलतीचा फायदा घेऊन नवीन पद्ध-तीचा प्रयोग करून पांहणें हें विद्वान् व प्रगमनशील शिक्षकांवर अवलंबून आहे; व शिक्षक लोक मनांत आणतील तर हा प्रयोग यशस्वी झाल्या वांचून राहणार नाहीं. आज ९० वर्षे इंग्रजींतून संस्कृत शिकविण्याची जी पद्धति सुरू आहे ती सामान्यतः कुचकामाची ठरली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. चार वर्षे संस्कृत शिकून संस्कृत क्रमिक पुस्तकांतील सबंद नियम खडाखड तोंडपाठ म्हणणाऱ्या मुलास रामायण भारतांतील साध्या चार श्लोकांचा अर्थ लावण्याची किती मारामार पडते, याचा अनुभव पुष्कळांस असेल ! संस्कृत वाङ्मयाविषयीं तरुण पिढींत अभिरुचि उत्पन्न करून, संस्कृत ग्रंथांचें वाचन, मनन व संशोधन वाढवावें हा जो संस्कृत भाषा युनिव्ह-र्सिटींत ठेवण्याचा हेतु, तो या पद्धतीनें किती सफळ झाला आहे याचा विचार प्रत्येक संस्कृताभिमान्यानें केला पाहिजे. या जुन्या पद्धतीनें शिकलेल्या विद्यार्थ्यां-पैकीं कांहीं लोक संस्कृत भाषेचे महान् पंडित झाले, ही गोष्ट खरी. पण, ते या पद्धतीच्या साहाय्यानें पंडित झाले नसून, स्वतःच्या बुद्धिसामर्थ्यानें—या पद्धतीच्या नादानपणास न जुमानतां—झाले, ही गोष्ट निर्विवाद आहे. या पद्धतीमुळें संस्कृतभाषेविषयीं आदर किंवा अभिरुचि उत्पन्न होण्याच्या ऐवजीं उलटा तिचा तिरस्कार व द्वेष मात्र वाढूं लागला आहे. मुंबई शहरांतील पुष्कळ पांढरपेशे हिंदू विद्यार्थी ‘ संस्कृत ’ सेकंड लँग्वेज ( दुसरी भाषा ) सोडून

'फ्रेंच,' 'पर्शियन' इत्यादि परकी भाषा शिकूं लागले आहेत! कां? 'फ्रेंच' शिकण्याची विशेष आवड म्हणून नव्हे; तर 'संस्कृत' कठीण आहे म्हणून! स्वतःच्या आवडीनें कोणी परकी भाषा शिकेल तर त्यांत कांहीं वावगें नाहीं. पण संस्कृतपेक्षां फ्रेंच किंवा पर्शियन भाषा सोपी या सबबीवर जेंव्हां पांढरपेशा वर्गांतील शेंकडो मुलें संस्कृतापासून पराङ्मुख होत आहेत, तेंव्हां ही एकच गोष्ट आजपर्यंत चालू असलेल्या व्याकरणप्रधान संस्कृत शिक्षण पद्धतीच्या डोक्यावर 'नादानपणा' चा छाप मारण्यास पुरेशी नाहीं काय? जुनी पद्धति हळू हळू बदलून मुलांच्या जन्मभाषेंतून सुंदर संस्कृत वाङ्मयाची ओळख गोड पद्धतीनें करून देण्याची वेळ या पूर्वींच आली होती—आतां अतिकाल झाला आहे. तरी या पुढें नवीं पुस्तकें देशभाषेंतून तयार करून तीं मुलांच्या हातीं देणें, हें मार्मिक विद्वानांचें काम आहे. कोणी संस्कृत पंडित अशीं उत्कृष्ट पुस्तकें लिहितील, तोंपर्यंत हा लहानसा प्रयत्न करून पाहिला आहे. यांत जो काय गुणांश असेल, तो भारतकरांचा—व्यासांचा—आहे. दोष असतील, त्यांचा मात्र धनी मी आहे. शिक्षकांनीं व विद्यार्थ्यांनीं या पुस्तकाचा उपयोग करून न्यूनाधिक्यें मला कळविल्यास त्यांचा मी फार आभारी आहे.

३१ मुंबई.<br>मे, १९१२.

पां. प्र. जोशी.

# भारत-रत्न-मंजूषा.

## वनपर्व.

### विदुरवाक्य-प्रत्याख्यानम्.

[ पांडव वनास गेल्यानंतर "आतां दुर्योधनादि मुलांस ताळ्यावर आणण्याकरितां मी काय करूं ?" अशी धृतराष्ट्रानें विदुरास पृच्छा केली. तेव्हां विदुरानें त्यास "दुर्योधनादिकांस हांकून देऊन युधिष्ठिरास गादीवर बसव" असें खडखडीत उत्तर दिलें. यावरून धृतराष्ट्रास राग येऊन त्यानें रागाच्या भरांत विदुरास आपले घरांतून चालता होण्यास सांगितलें ! ]

#### वैशंपायन उवाच.

वनं प्रविष्टेष्वथ पांडवेषु प्रज्ञाचक्षुस्तप्यमानोऽऽविकेयः ।
धर्मात्मानं विदुरमगाधबुद्धिं सुखासीनो वाक्यमुवाच राजा ॥ १ ॥

#### धृतराष्ट्र उवाच.

प्रज्ञा च ते भार्गवस्येव शुद्धा, धर्मं च त्वं परमं वेत्थ सूक्ष्मम् ।
समश्चत्वं संमतः कौरवाणां पथ्यं चैषां मम चैव ब्रवीहि ॥ २ ॥
एवं गते विदुर यदद्य कार्यं पौराश्चेमे कथमस्मान्भजेरन् ।
ते चाप्यस्मान्नोद्धरेयुः समूलांस्तत्त्वं ब्रूयाः साधु कार्याणि वेत्सि ॥ ३ ॥

---

१ प्रज्ञा (बुद्धि) चे आहेत चक्षु (डोळे) ज्याचे तो–धृतराष्ट्र. याला चर्मचक्षु नव्हते; फक्त ज्ञानदृष्टि मात्र होती. २ अंबिकेचा पुत्र धृतराष्ट्र. तप्यमानः + आंबिकेयः=तप्यमान आंबिकेयः असा संधि विसर्गाचा लोप होऊन व्हावा. पण, येथें आर्ष–ऋषिप्रयुक्त–संधि आहे. ३ मऊ आसनावर सुखानें बसलेला. ४ शुक्राचार्य. ५ (धर्मादि द्यूतांत पराजित होऊन वनवासास गेले आहेत) अशा स्थितींत. ६ आम्हां-वर प्रीति करितील. ७ आमचें उन्मूलन करितील; उपटून टाकतील. ८ मूळा सकट.

## विदुर उवाच.

[१]त्रिवर्गोऽयं धर्ममूलो[२] नरेन्द्र राज्यं चेदं धर्ममूलं वदंति ।
धर्मे[३] राजन्वर्तमानः स्वशक्त्या पुत्रान्सर्वान्पाहि पांडोःसुतांश्च ॥ ४ ॥
स वै [४]धर्मो वि[५]प्रलब्धः सभायां पापात्मभिः सौबलेय[६]प्रधानैः ।
आहूय कुंतीसुतमक्षवत्[७]यां पराजैषीत्सत्य[८]संधं सुतस्ते ॥ ५ ॥
एतस्य ते दुष्प्रणीतस्य[९] राजञ्छेष[१०]स्याहं परिपश्याम्युपायम् ।
यथा पुत्रस्तव कौरव्य पापान्मुक्तो लोके प्रतितिष्ठे[११]त साधु ॥ ६ ॥
तद्वै सर्वं पांडुपुत्रा लभंतां यत्तद्राजन्नभिसृ[१२]ष्टं त्वयासीत् ।
एष धर्मःपरमो यत्स्व[१३]केन, राजा तुष्येन्न पर[१४]स्वेषु गृ[१५]ध्येत् ॥ ७ ॥
यशो न नश्येज्ज्ञा[१६]तिभेदश्च न स्याद्धर्मो न स्यान्[१७]नैव चैवं कृते त्वाम् ।
एतत्कार्यं तव सर्वप्र[१८]धानं तेषां तुष्टिः शकुनेश्चावमानः ॥ ८ ॥
एवं शेषं[१९] यदि पुत्रेषुते स्यादेतद्राजंस्त्व[२०]रमाणः कुरुष्व ।
[२१]तथैतदेवं न करोषि राजन्ध्रुवं[२२] कुरूणां भविता विनाशः ॥ ९ ॥
न हि क्रुद्धो भीमसेनोऽर्जुनो वा, शेषं [२३]कुर्याच्छात्र[२४]वाणाम[२५]नीके ।
येषां योद्धा सव्य[२६]साची कृता[२७]स्त्रो धनुर्येषां गांडिवं लोक[२८]सारम् ॥ १० ॥

---

१ धर्म, अर्थ व काम हे तीन अर्थ. २ धर्म आहे मूळ ज्याचें असा. ३ धर्मानें चालून. ४ युधिष्ठिर. ५ फसविला गेला. ६ शकुनि प्रभृति मंडळीनें. ७ अक्षवती=द्यूतसभा, जुगार, अक्ष=फांसा. ८ सत्य प्रतिज्ञेचा. संध्या–प्रतिज्ञा. ९ दुष्ट लोकानीं केलेला. १० शेष–वध (पांडव मानहानि रूपी वध). ११ नांदेल, राहील. १२ दिलेलें. १३ स्वक=स्वतःचें धन. १४ परस्व=परधन. १५ न गृध्येत्=अभिलाष धरूं नये. याच गृध् (गृध्यति) धातू पासून गृध्र म्ह० गिधाड हा शब्द झाला. गृध्र=अति हांवरा व खादाड पक्षी. १६ बांधव. १७ अन्वय–एवं कृते सति त्वां धर्मो न स्यात् इति नैव (किंतु स्यादेव). स्यात् (सज्जेत्) हें मूळचें विध्यर्थी क्रियापद, पण येथें अव्यया प्रमाणें योजिलें आहे. १८ सर्व गोष्टींच्या पूर्वी. १९ भागयाचा अवशेष. २० त्वरेनें; त्वरा करून. येथें वर्तमानकाळवाचक धातुसाधित घालून अव्ययाचा अर्थ आणला आहे. २१ एतदेवं=असेंच; हेंच. २२ खास; निःसंशय. २३ शेषं न कुर्यात्-थोडा भाग सुद्धां अवशिष्ट राहूं देणार नाहीं. २४ शत्रूंच्या लोकांचा. २५ लढाईत. २६ अर्जुन. २७ ज्यानें अस्त्रें संपादन केलीं आहेत, असा. २८ जगाचें सार (अर्क) असें, म्ह० अत्यंत शक्तिमत्.

Digitized by Siddhanta eGangotri Gyaan Kosha



येषां भीमो बाहुशाली च योद्धा तेषां लोके किं नु न प्राप्यमस्ति ।
उक्तं पूर्वं जातमात्रे सुते ते[1] मया यत्तेऽहितमासीत्तदानीम् ॥ ११ ॥
पुत्रं त्यजेममहितं कुलस्य हितं परं न च तत्त्वं चकर्थ ।
इदं च राजन्हितमुक्तं न चेत्त्वमेवंकर्ता परितप्तासि[2] पश्चात् ॥ १२ ॥
यद्येतदेवमनुमंता[3] सुतस्ते संप्रीयमाणः पांडवैरेकराज्यम् ।
तापो न ते भविता प्रीतियोगान्न चेन्निगृह्णीष्व[4] सुतं सुखाय ॥ १३ ॥
दुर्योधनं त्वहितं वै निगृह्य पांडोःपुत्रं प्रकुरुष्वाधिपत्ये[5] ।
अजातशत्रुर्[6]हि विमुक्तरागो[7] धर्मेणेमां पृथिवीं शास्तु राजन् ॥ १४ ॥
ततो राजन्पार्थिवाः सर्वे एव वैश्या इवास्मानुपतिष्ठंतु सद्यः ।
दुर्योधनः शकुनिः सूतपुत्रः प्रीत्या राजन्पांडुपुत्रान्भजंतु ॥ १५ ॥
दुःशासनो याचतु[8] भीमसेनं सभामध्ये द्रुपदस्यात्मजां च ।
युधिष्ठिरं त्वं परिसांत्वयस्व राज्ये चैनं स्थापयस्वाभिपूज्य ॥ १६ ॥
त्वया पृष्टः किमहमन्यद्वदेयमेतत्कृत्वा कृतकृत्योऽसि राजन् ॥ १७ ॥

## धृतराष्ट्र उवाच.

एतद्वाक्यं विदुर यत्ते सभायामिह प्रोक्तं पांडवान्प्राप्य[9] मां च ।
हितं तेषामहितं मामकानाम[10]तत्सर्वं मम नोवैति[11] चेतः ॥ १८ ॥
इदं त्विदानीं कुत एव निश्चितं तेषामर्थे पांडवानां यदात्थ ।
तेनाद्य मन्ये नासि हितो ममेति कथं हि पुत्रं पांडवार्थे त्यजेयं ? ॥ १९ ॥
असंशयं तेपि ममैव पुत्रा दुर्योधनस्तु मम देहात्प्रसूतः ॥
स्वं वै देहं परहेतोस्त्यजेति कोनु ब्रूयात्समताम[12]न्ववेक्ष्य ॥ २० ॥

---

१ दुर्योधन जन्मतांच धृतराष्ट्राला विदुरानें सांगितलें होतें कीं "हा पुत्र कुळाचें वाटोळें करील; यास्तव त्याला तूं टाकून दे." २ तूं असें न करशील, तर पुढें तुला पश्चात्ताप होईल. ३ कबूल करील. ४ (पुत्राचा) निग्रह कर; आपल्या पोराला आंवरून धर. ५ राज्यावर बसव. ६ युधिष्ठिर. ७ निरिच्छ; निस्पृह. ८ "याच्" हा धातु आत्मनेपदी असून "याचतु" असा परस्मैपदी प्रयोग 'आर्ष' आहे. ९ पांडवाचा कड घेऊन. प्राप्य=संबंधीं. १० माझ्या पुत्राचें. ११ माझ्या मनास पटत नाहीं. १२ निःपक्षपाताचा अवलंब करून.

स मां जिह्मं विदुर सर्वं ब्रवीषि मानं च तेऽहमधिकं धारयामि ।
यथेच्छकं गच्छ वा तिष्ठ वा त्वं सुसांत्व्यमानाप्यसती स्त्री जहाति ॥ २१ ॥

**वैशंपायन उवाच.**

एतावदुक्त्वा धृतराष्ट्रोऽन्वपद्यदंतर्वेश्म सहसोत्थाय राजन् ।
नेदमस्तीत्यथ विदुरो भाषमाणः संप्राद्रवद्यत्र पार्था बभूवुः ॥ २२ ॥



## द्रौपद्याश्वासनम्.

[ पांडव द्यूत खेळून सर्व राज्य हरले, तेव्हां भगवान् कृष्ण एका युद्धांत गुंतला होता पांडव वनवासास गेल्यावर, तो मोकळा होतांच वनांत त्यांस भेटण्या करितां गेला. त्याला पाहतांच द्रौपदीस गहिंवर येऊन तिनें दुःशासनादि पाप्यांनीं आपला भरसभेंत कसा उपमर्द व छळ केला तें सांगून आपल्या पतींपैकीं कोणीहि आपणास कसें सोडविलें नाहीं तो सर्व प्रकार निवेदन केला व क्रोधाविष्ट होऊन कृष्णास बोलली कीं "माझें असें या जगांत कोणीहीं नाहीं. सर्व असून व्यर्थ आहेत, तूंहि माझा कोणी नव्हेस" हे त्या साध्वीचे दुःखोद्गार ऐकून कृष्णानें ही "तुमच्या शत्रूंच्या बायका लवकरच अशा रडतील, यांत शंका नाहीं" असें निश्चयपूर्वक सांगून तिची समजूत केली. ]

एवमुक्ते तु वचने केशवेन महात्मना ।
तस्मिन्वीरसमावाये संरब्धेष्वथ राजसु ॥ १ ॥
धृष्टद्युम्नप्रमुखैर्भ्रातृभिः परिवारिता ।
पांचाली पुंडरीकाक्षमासीनं भ्रातृभिः सह ॥ २ ॥
अभिगम्याब्रवीत्क्रुद्धा शरण्यं शरणैषिणी ।
त्वं प्रभुस्त्वं विभुश्च त्वं भूतात्मा त्वं विचेष्टसे ॥ ३ ॥

---

१ कुटिल; वांकडें. २ तुझा (व्यर्थ) अधिक मान ठेवितों. ३ मनास वाटेल तर; (अव्यय) ४ छिनाल बायकोचें कितीही समाधान केलें तरी ती (नवऱ्याला) सोडून जातेच ! (तसा तूंही जाणार, तर खुशाल जा !) ५ घरांत गेला. ६ "नेदमस्ति" हें कुळ नाहींसें होईल ! ७ एकदम घाईघाईनें निघून गेला. ८ वीरांच्या समुदायांत. ९ संतापलेले. १० वेष्टिलेली. ११ द्रौपदी-पांचाळ राजाची मुलगी. १२ कमलनयन-कृष्ण. १३ सहायकर्त्याला, रक्षित्याला. १४ सहाय इच्छिणारी, रक्षणेच्छु. १५ सर्व शक्तिमान्. १६ सर्वव्यापी. १७ क्रीडा, चेष्टा, करीत आहेस.

लोकपालाश्च लोकाश्च नक्षत्राणि दिशो दश ।
नभश्चंद्रश्च सूर्यश्च त्वयि सर्वं प्रतिष्ठितम्[1] ॥ ४ ॥
मर्त्यता चैव भूतानाममरत्वं दिवौकसाम् ।
त्वयि सर्वं महाबाहो लोककार्यं प्रतिष्ठितम् ॥ ५ ॥
सा तेऽहं दुःखमाख्यास्ये प्रणयान्मधुसूदन ।
ईशस्त्वं सर्वभूतानां ये दिव्या येच मानुषाः ॥ ६ ॥
कथं नु भार्या पार्थानां तव कृष्ण सखी विभो ।
धृष्टद्युम्नस्य भगिनी सभां कृष्येत[2] मादृशी[3] ? ॥ ७ ॥
स्त्रीधर्मिणी[4] वेपमाना दुःखिता कुरुसंसदि[5] ॥ ८ ॥
दृष्ट्वा च मां धार्तराष्ट्राः प्राहसन्पापचेतसः ॥ ९ ॥
दासीभावेन मां भोक्तुमीषुस्ते मधुसूदन ।
जीवत्सु[6] पांडुपुत्रेषु पंचालेषु[6] च वृष्णिषु[6] ॥ १० ॥
नन्वहं कृष्ण भीष्मस्य धृतराष्ट्रस्य चोभयोः ।
स्नुषा भवामि धर्मेण साहं दासी कृता बलात् ॥ ११ ॥
गर्हये[7] पांडवांस्त्वेव युधिश्रेष्ठान्[8]महाबलान् ।
यत् क्लिश्यमानां[9] प्रेक्षंते धर्मपत्नीं यशस्विनीं ॥ १२ ॥
धिग्बलं भीमसेनस्य धिक्पार्थस्य च गांडिवम् ।
यौ मां विप्रकृतां क्षुद्रैर्मर्षयेतां[10] जनार्दन ॥ १३ ॥
शाश्वतोयं[11] धर्मपथः सद्भिराचरितः सदा ।
यद्भार्यां परिरक्षंति भर्तारोऽल्पबला[12] अपि ॥ १४ ॥

---

१ तुजमुळें प्रतिष्ठा पावलें आहे; तूं त्याचा आधार आहेस. २ ओढिली जावी. ३ माझ्या सारखी. ४ ऋतुमती; रजस्वला. ५ कौरवांच्या सभेंत. ६ पांचाळ, पांडव, व वृष्णि (यादव) हे घडघडित जिवंत असतां, त्यांनां न जुमानतां (ही सती सप्तमी आहे.) ७ दोष देतें; ठपका ठेवतें. ८ युद्धांत श्रेष्ठ-अलुक्स. ९ गांजलेली, छळलेली, अवमानित. १० सहन करितात. ११ निश्चित, कायमचा. १२ दुर्बळ.

भार्यायां रक्ष्यमाणायां प्रजा[1] भवति रक्षिता ।
प्रजायां रक्ष्यमाणायामात्मा[2] भवति रक्षितः ॥ १५ ॥
आत्मा हि जायते तस्यां तस्माज्जाया भवत्युत ।
भर्ता च भार्यया रक्ष्यः कथं जायान्ममोदरे ॥ १६ ॥
नन्विमे शरणं प्राप्तं न त्यजंति कदाचन ।
ते मां शरणमापन्नां नान्व[3]पद्यंत पांडवाः ॥ १७ ॥
धिग्बलं भीमसेनस्य धिक्पार्थस्य च जीवितं ।
यत्र दुर्योधनः कृष्ण मुहूर्त[4]मपि जीवति ॥ १८ ॥
एवं क्लेशैः सुबहुभिः क्लिश्यमाना सुदुःखिता ।
निवसाम्यार्यया[5] हीना[6] कृष्ण धौम्यपुरःसरा ॥ १९ ॥
त इमे सिंहविक्रान्ता[7] वीर्येणाभ्यधिकाः परैः[8] ।
[9]निहीनैः परिक्लिश्यंतीं समुपेक्षंति[10] मां कथम् ॥ २० ॥
एतादृशानि दुःखानि सहंती दुर्बलीयसां ।
दीर्घकालं प्रदीप्ता[11]ऽस्मि पापानां पापकर्मणाम् ॥ २१ ॥
कुले महति जातास्मि दिव्येन[12] विधिना किल ।
पांडवानां प्रिया भार्या स्नुषा पांडोर्महात्मनः ॥ २२ ॥
कचग्रहम[13]नुप्राप्ता साऽस्मि कृष्ण वरा सती ।
[14]पंचानां पांडुपुत्राणां प्रेक्षतां मधुसूदन ॥ २३ ॥
इत्युक्त्वा प्रारुदत्कृष्णा मुखं प्रच्छाद्य पाणिना ।
पद्मकोश[15]प्रकाशेन मृदुना मृदुभाषिणी ॥ २४ ॥

---

१ संतति. २ "आत्मा वै पुत्रः" अशी श्रुति आहे. ३ माझें रक्षण करण्यास आले नाहींत. ४ क्षणभर. ५ कुंतीसासूबाईंच्या विरहित—त्यांच्यापासून दूर. ६ धौम्य ऋषींच्या उपदेशाप्रमाणें वागणारी. ७ सिंहाप्रमाणें विक्रम म्ह० पराक्रम आहे ज्यांचा ते. ८ शत्रूं पेक्षां. ९ नीच, अकुलीन, क्षुद्र अशा (शत्रूंकडून). १० उपेक्षा करितात. ११ संतापलेली. १२ द्रौपदी यज्ञापासून उत्पन्न झाली होती. १३ केशा-कर्षणाच्या-केश धरून ओढिली जाण्याच्या—उपमर्दास प्राप्त झालें. १४ पांच पांडवांच्या डोळ्यांदेखत. १५ ज्याचा प्रकाश कमळाच्या गाभ्याच्या प्रकाशाप्रमाणें होता, अशा (हातानें).

स्तनावपतितौ[1] पीनौ सुजातौ[2] शुभलक्षणौ ।
अभ्यवर्षत[3] पांचाली दुःखजैरश्रुबिंदुभिः ॥ २५ ॥
चक्षुषी परिमार्जंती[4] निःश्वसंती पुनः पुनः ।
वाष्पपूर्णेन[5] कंठेन क्रुद्धा वचनमब्रवीत् ॥ २६ ॥
नैव मे पतयः संति न पुत्रा न च बांधवाः ।
न भ्रातरो नच पिता नैव त्वं मधुसूदन ॥ २७ ॥
ये मां विप्रकृतां क्षुद्रैरुपेक्षध्वं[6] विशोकवत्[7] ।
न च मे शाम्यते दुःखं कर्णो यत्प्राहसत्तदा[8] ॥ २८ ॥
चतुर्भिः कारणैः कृष्ण त्वया रक्ष्याऽस्मि नित्यशः ।
संबंधाद्[9]गौरवात्[10]सख्यात्[11]प्रभुत्वेनैव[12] केशव ॥ २९ ॥

**वैशंपायन उवाच.**

अथ तामब्रवीत् कृष्णस्तस्मिन्वीरसमागमे[13] ।

**वासुदेव उवाच.**

रोदिष्यंति स्त्रियो ह्येवं येषांक्रुद्धासि भाविनि[14] ॥ ३० ॥
बीभत्सु[15]शरसंच्छन्नान् शोणितौघपरिप्लुतान् ।
निहतान्वल्लभान्वीक्ष्य[16] शयानान्वसुधातले ॥ ३१ ॥
यत्समर्थं[17] पांडवानां तत्करिष्यामि मा शुचः ।
सत्यं ते प्रतिजानामि[18] राज्ञां राज्ञी भविष्यसि ॥ ३२ ॥
[19]पतेद्द्यौर्हिमवान्[20] शीर्येत्पृथिवी शकली[21]भवेत् ।
[22]शुष्येत्तोयनिधिः कृष्णे न मे मोघं[23] वचो भवेत् ॥ ३३ ॥

---

१ अपतित=ताठ. २ सुंदर. ३ भिजविती झाली. ४ पुसणारी. ५ सगद्गद कंठानें; गळा भरून येऊन. ६ दुर्लक्ष करितां. ७ जसें कांहीं मला दुःखच झालें नाहीं, असें समजून. ८ 'खो' 'खो' हांसला! ९ नात्यामुळें. १० थोर योग्यतेमुळें. ११ स्नेहामुळें, घरोब्यामुळें. १२ सामर्थ्यामुळें. १३ वीरसमुदायांत. १४ हे सुंदर व सुशील द्रौपदि! १५ अर्जुन. १६ अन्वय-भाविनि, येषां क्रुद्धासि तेषां स्त्रियः वल्लभान् बीभत्सुशरसंच्छन्नान्, शोणितौघपरिप्लुतान्, निहतान्, वसुधातले शयानान्वीक्ष्य एवं रोदिष्यंति. १७ योग्य, हितप्रद. १८ प्रतिज्ञेनें सांगतों १९ अकाश कोसळून खालीं पडेल. २० हिमालय पर्वत फुटून जाईल; चिंधड्या उडतील. २१ तुकडे होतील. २२ सुकेल; आटेल. २३ व्यर्थ, असत्य.

# ब्रह्मसंग्रहः

[पांडव द्वैतवनांत होते त्या समयीं बक दाल्भ्य नांवाच्या ऋषीनें युधिष्ठिराच्या ब्राह्मणांवरील प्रेमाबद्दल त्याची स्तुति करून असें प्रतिपादन केलें कीं राजे लोक जर ब्रह्मबुद्धिचा संग्रह करितील तरच ते अत्यंत बळवान् होतील व राज्यकारभार सुयंत्रित तऱ्हेनें चालेल.]

* वसत्सु वै द्वैतवने पांडवेषु महात्मसु ।
अनुकीर्णं[1] महारण्यं ब्राह्मणैः समपद्यत ॥ १ ॥
ईर्यमाणेन[2] सततं ब्रह्मघोषेण सर्वशः ।
ब्रह्मलोकसमं पुण्यमासीद्द्वैतवनं सरः ॥ २ ॥
यजुषा[3]मृचां[4] साम्नां[5] च गद्यानां चैव सर्वशः ।
आसीदुच्चार्यमाणानां निःस्वनो[6] हृदयंगमः ॥ ३ ॥
ज्याघोष[7]श्चैव पार्थानां ब्रह्मघोषश्च धीमतां ।
संसृष्टं[8] ब्रह्मणा[9] क्षत्रं[10] भूय[11] एव व्यरोचत[12] ॥ ४ ॥
अथाब्रवीद्बको[13] दाल्भ्यो धर्मराजं युधिष्ठिरं ।
[14]संध्यां कौंतेयमासीनमृषिभिः परिवारितं ॥ ५ ॥
पश्य द्वैतवने पार्थ ब्राह्मणानां तपस्विनां ।
होमवेलां[15] कुरुश्रेष्ठ संप्रज्वलित[16]पावकां ॥ ६ ॥
चरंति धर्मं पुण्येऽस्मिंस्त्वया गुप्ता[17] धृतव्रताः[18] ।
भृगवो[19]ऽगिरसं[20]श्चैव वासिष्ठाः काश्यपैः सह ॥ ७ ॥

---

* या पाठांत योजिलेला 'ब्राह्मण' शब्द जातिवाचक नाहीं. ब्राह्मण म्हणजे ज्ञानसंपन्न पुरुष असा अर्थ समजावा. १ व्याप्त झालें, भरून गेलें. २ ईर्यमाण—कोंदाटलेलें, दुमदुमलेलें. इर् (इरयति) दुमदुमणें ३ स्तोत्रांचा. ४ ऋचांची. ५ संगीताचा. ६ नाद, घोष. ७ धनुष्याच्या दोरीचा टणत्कार. ८ संयुक्त; संयोग पावलेलें. ९ ब्रह्मतेज. १० क्षात्र तेज. ११ अधिक; फार १२ शोभूं लागलें. १३ एका ब्राह्मणाचें नांव. १४ संध्या करून बसलेला. १५ होमाची वेला. १६ संप्रज्वालितः पावक. (अग्निः) यस्यां सा. १७ राखिले जात आहेत. १८ व्रतस्थ; कांहीं व्रत पतकरलें आहे ज्यांनीं असे. १९ भृगूचे वंशज. २० अंगिराचे वंशज.

आगस्त्याश्च महाभागा[1] आत्रेयाश्चोत्तमव्रताः ।
सर्वस्य जगतः श्रेष्ठा ब्राह्मणाः संगतास्त्वया ॥ ८ ॥
इदं तु वचनं पार्थ श्रुणुष्व गदतो मम ।
भ्रातृभिः सह कौंतेय यत्त्वां वक्ष्यामि कौरव ॥ ९ ॥
ब्रह्म क्षत्रेण संसृष्टं क्षत्रं च ब्रह्मणा सह ।
उदीर्णे दहंतः[2] शत्रून्वनानीवाग्निमारुतौ ॥ १० ॥
नाब्राह्मणः[3] तात चिरं बुभूषेत्[4] दिच्छन्निमं लोकममुं च जेतुं ।
विनीतधर्मार्थम्[5] अपेतमोहं[6] लब्ध्वा द्विजं नुदति[7] नृपः सपत्नान्[8] ॥ ११ ॥
चरन्[9] नैश्रेयसं धर्मं प्रजापालनकारितम्[10] ।
नाध्यगच्छद्बलिर्[11] लोके तीर्थम्[12] अन्यत्र[13] वै द्विजात् ॥ १२ ॥
अनूनम्[14] आसीदसुरस्य कामैः[15] वैरोचनेः श्रीरपि चाक्षया[16] आसीत् ।
लब्ध्वा महीं ब्राह्मणसंप्रयोगात्[17] तेष्वाचरन्दुष्टम्[18] अथो[19] व्यनश्यत् ॥ १३ ॥
नाब्राह्मणं भूमिरियं सभूतिः[20] वर्णं द्वितीयं[21] भजते चिराय ।
समुद्रनेमिः[22] नमते तु तस्मै यं ब्राह्मणः शास्ति नयैर्विनीतम् ॥ १४ ॥
कुंजरस्येव[23] संग्रामे परिगृह्यांकुशग्रहं ।
ब्राह्मणैर्विप्रहीनस्य क्षत्रस्य क्षीयते बलं ॥ १५ ॥

---

१ पुण्य, पवित्र. २ एकत्र होऊन उठलीं असतां ( द्वि. व. ) शत्रूला जाळून टाकतात. ३ अ-ब्राम्हणः—पदरीं ब्राह्मण नसलेला ( क्षत्रिय ). ४ ऐश्वर्यामिच्छेत्. ५ धर्म व अर्थ हे जो शिकला आहे असा; विनीतो धर्माथौं येन सः. ६ ज्याचा मोह गेला आहे असा. ७ हांकून लावितो. ८ शत्रूंना. ९ ब्रह्मपदाला पोंचविणारा. १० प्रजापालनापासून उत्पन्न होणारा. ११ एका असुर राजाचें नांव. १२ पुण्य वस्तु, तारणारा उपाय. १३ द्विजेतर मनुष्यांमध्यें. १४ इच्छित वस्तूंची प्राप्ति कांहीं अल्प होती असें नाहीं, ह्म० सर्व इष्ट वस्तु त्याला प्राप्त होत होत्या. १५ बलि. १६ संपूर्ण, भरपूर. १७ ब्राह्मणांच्या बुद्धीचा अवलंब केल्यामुळें. १८ दुष्टपणानें वागल्यानें. १९ अथ. २० समृद्धियुक्त, समृध्ध. २१ क्षत्रिय वर्ण. २२ समुद्रानें परिवेष्टित, (समुद्रः नेमिः यस्याः सा भूमिः); नेमिः-परिधि. २३ यथा संग्रामे कुंजरस्य अंकुशग्रहं परिगृह्य बलं क्षीयते तथा ब्राम्हणैर्विप्रहीनस्य क्षत्रस्य बलं क्षीयते; कुंजर—हत्ति; परिगृह्य-वर्जयित्वा; अंकुशग्रहः—महात; विप्रहीन-वांचून, शिवाय.

ब्रह्मण्यनुपमा दृष्टिः क्षात्रमप्रतिमं बलं ।
¹तौ यदा चरतः सार्धं तदा लोकः² प्रसीदति ॥ १६ ॥
यथा हि सुमहानग्निः कक्षं³ दहति सानिलः ।
तथा दहति राजन्यो ब्राह्मणेन समं रिपुं ॥ १७ ॥
ब्राह्मणेष्वेव⁴ मेधावी⁵ बुद्धिपर्यषेणं चरेत् ।
अलब्धस्य च लाभाय लब्धस्य परिवृद्धये ॥ १८ ॥
अलब्धलाभाय च लब्धवृद्धये यथार्हतीर्थप्रतिपादनाय⁶ ।
यशस्विनं वेदविदं विपश्चितं⁷ बहुश्रुतं⁸ ब्राह्मणमेव वासय⁹ ॥ १९ ॥
ब्राह्मणेषूत्तमा वृत्तिस्तव¹⁰ नित्यं युधिष्ठिर ।
तेन ते सर्व लोकेषु दीप्यते प्रथितं यशः ॥ २० ॥

**वैशंपायन उवाच.**

ततस्ते ब्राह्मणाः सर्वे बकं दाल्भ्यमपूजयन् ।
युधिष्ठिरे स्तूयमाने भूयः¹¹ सुमनसोऽभवन्¹² ॥ २१ ॥



## द्रौपदीपरीतापवाक्यम्.

[ पांडव वनांत असतां एके प्रसंगीं द्रौपदी व युधिष्ठिर यांजमध्यें संवाद झाला. द्रौपदी बोलली "आम्हांला जेव्हां वनांत घालविलें त्यावेळेस सर्वांच्या डोळ्यांस टिपें आलीं, पण त्या दुर्योधनादिकांस यत्किंचित्‌ही वाईट वाटलें नाहीं; इतकेंच नव्हे तर ते उलटे आनंदानें नाचूं लागले ! असें असतां महाराज ! आपणांस राग येत नाहीं काय ? आपलें राज्य गेलें; वैभव नष्ट झालें; आपण व आपले बंधू सुखांत रुळलेले व शरीरकष्टाला अनुचित असे असून त्यांस आज कष्ट सोसावे लागत आहेत, हें पाहून आपला क्रोध कसा भडकत नाहीं ? माझी विटंबना आपणास कशी सहन

१ तीं दोन्ही जेव्हां हातांत हात घालून साहचर्यानें चालतात. २ जग प्रसन्न होतें, सुखी होतें. ३ गवताची गंज. ४ ब्राह्मणांच्या बुद्धिचें साकल्यें करुन संग्रहण करावें. ५ बुद्धिमानानें. ६ सत्पात्रीं दान होण्याकरितां. ७ शहाणा. ८ विद्वान्. ९ जवळ बाळग, संग्रहीं ठेव. १० वर्तन. ११ अत्यंत. १२ प्रसन्नचित्त.

झाली ? कीं आपल्या अंगांत तेजच नाहीं ? एरव्हीं स्वस्थ कसे बसलां असतां? ही क्षमेची वेळ नव्हे; तेज दाखविण्याची–पराक्रम गाजविण्याची–ही वेळ आहे; तर उठा." या भाषणास युधिष्ठिरानें समर्पक उत्तर दिलें कीं "राग व तेज या वस्तु एक नव्हेत. तुझा ग्रह चुकीचा झाला. आहे. राग हा दुष्ट मनोविकार आहे व त्याचा प्रतिबंध करण्यास तेजाची अपेक्षा असते. त्यानें सर्व मानवजातीचें नुकसान होईल. पिता पुत्रास विचारणार नाहीं, गुरु शिष्यास विचारणार नाहीं, व सर्व मनुष्यकोटीचा क्षय होऊन जाईल. क्षमा ही सर्वांत सलोखा उत्पन्न करते. क्षमा हींच तेज होय. क्षमा ज्याला साध्य झाली त्यास सर्व कांहीं सिद्धी प्राप्त झाल्याच. मला ती शक्ति आहे, व म्हणून मी क्षमेचा अवलंब करूं शकतों. दुर्योधनादिकांस गुरुजन सांगत असतांहि तिचा आश्रय करण्याची बुद्धि होत नाहीं, या करितां ते नाश पावतील."]

## वैशंपायन उवाच.

ततो वनगताः पार्थाः सायाह्ने कृष्णया[1] सह ।
उपविष्टाः कथाश्चक्रुर्दुःखशोकपरायणाः ॥ १ ॥
प्रिया च दर्शनीया[2] च पंडिता च पतिव्रता ।
अथ कृष्णा धर्मराजमिदं वचनमब्रवीत् ॥ २ ॥

## द्रौपद्युवाच.

न नूनं तस्य पापस्य दुःखमस्मासु[3] किंचन ।
विद्यते धार्तराष्ट्रस्य नृशंसस्य[4] दुरात्मनः ॥ ३ ॥
यस्त्वां राजन्मया सार्धमजिनैः[5] प्रतिवासितम् ।
वनं प्रस्थाप्य[6] दुष्टात्मा नान्वतप्यत[7] दुर्मतिः ॥ ४ ॥
आयसं[8] हृदयं नूनं तस्य दुष्कृतकर्मणः ।
यस्त्वां धर्मपरं श्रेष्ठं रूक्षाण्य[9]श्रावयत्[10]तदा ॥ ५ ॥

---

१ द्रौपदी. २ सुंदर. ३ त्या पाप्याला आमच्या बद्दल बिलकूल दुःख वाटत नाहीं. ४ क्रूर. ५ हरिणाचीं कांतडीं परिधान करविलीं आहेत ज्या कडून त्या तुला. ६ पाठवून. प्रस्था–निघणें, जाणें. 'प्रस्थाप्य' हें त्याचें प्रयोजक रूप. ७ अनुताप पावला. ८ लोखंडी, पोलादी, अति कठीण. ९ कठोर शब्द; रूक्षाणि-रूक्षाणि वचांसि. १० ऐकविले.

सुखोचितमदुःखार्हं[1] दुरात्मा ससुहृद्गणः ।
ईदृशं दुःखमानीय[2] मोदते पापपूरुषः ॥ ६ ॥
चतुर्णामेव[3] पापानामस्रं[4] न पतितं तदा ।
त्वयि भारत निष्क्रान्ते वनायाजिनवाससि[5] ॥ ७ ॥
दुर्योधनस्य कर्णस्य शकुनेश्च दुरात्मनः ।
दुर्भ्रातुस्तस्य चोग्रस्य राजन्दुःशासनस्य च ॥ ८ ॥
इतरेषां तु सर्वेषां कुरूणां कुरुसत्तम ।
दुःखेनाभिपरीतानां[6] नेत्रेभ्यः प्रापतज्जलं ॥ ९ ॥
इदं च शयनं दृष्ट्वा यच्चासीत्ते पुरातनं ।
शोचामि त्वां महाराज दुःखानर्हं सुखोचितं ॥ १० ॥
[7]दांतं यच्च सभामध्य आसनं रत्नभूषितं ।
दृष्ट्वा कुशबृसीं[8] चेमां शोको मां रुंधयेत्ययं[9] ॥ ११ ॥
यदपश्यं सभायां त्वां राजभिः परिवारितं ।
तच्च राजन्न पश्यंत्याः का शान्तिर्हृदयस्य मे ॥ १२ ॥
या त्वाऽहं चन्दनादिग्ध[10]मपश्यं सूर्यवर्चसं[11] ।
सा त्वां पंकमला[12]दिग्धं दृष्ट्वा मुह्यामि भारत ॥ १३ ॥
या त्वाऽहं [13]कौशिकैर्वस्त्रैः शुभ्रैराच्छादितं पुरा ।
दृष्टवत्यस्मि राजेन्द्र सा त्वां पश्यामि [14]चीरिणं ॥ १४ ॥
यच्च तद्रुक्मपात्री[15]भिर्ब्राह्मणेभ्यः सहस्रशः ।
व्हियते ते गृहादन्नं संस्कृतं[16] सार्वकामिकं[17] ॥ १५ ॥

---

१ दुःखाला अयोग्य. २ ( दुःखाप्रत ) नेऊन ३ दुर्योधन, दुःशासन, कर्ण व शकुनि या चौघांचें. ४ अश्रु, टीप. ५ आजिनं वासः यस्य स अजिनवासाः तास्मिन् त्वयि=तुम्ही मृगचर्मे धारण करून निघालां तेव्हां. ६ दुःखामध्यें निमग्न झालेल्यांच्या. ७ हस्तिदंती. ८ दर्भाची बैठक. बृसी=आसन. ९ अडखळवितो, म्ह० गहिंवरवितो. १० आदिग्ध-लिप्त. ११ सूर्याप्रमाणें तेज आहे ज्याचें अशा तुला. वर्चस् ( न. )=तेज. १२ चिखल व मळ यांनीं माखलेला. १३ रेशमी. १४ वल्कलें धारण करणारा-चीराणि अस्य सन्ति इति चीरी तं चीरिणम्. १५ सोन्याचीं भांडी हातांत घेतलेला. १६ मीठ मसाला घालून तयार केलेलें. १७ सर्व इच्छा पुरविणारें.

यतीनामगृहाणां ते तथैव गृहमेधिनां ।
दीयते भोजनं राजन्नतीव गुणवत्प्रभो ॥ १६ ॥
सत्कृतानि सहस्राणि सर्वकामैः पुरा गृहे ।
सर्वकामैः सुविहितैर्यदपूजयथा द्विजान् ॥ १७ ॥
तच्च राजन्न पश्यंत्याः का शांतिर्हृदयस्य मे ।
यत्ते भ्रातॄन्महाराज युवानो मृष्टकुंडलाः ॥ १८ ॥
अभोजयन्त मृष्टान्नैः सूदैः परमसंस्कृतैः ।
सर्वांस्तानद्य पश्यामि वने वन्येन जीविनः ॥ १९ ॥
अदुःखार्हान्मनुष्येन्द्र नोपशाम्यति मे मनः ।
भीमसेनमिमं चापि दुःखितं वनवासिनं ॥ २० ॥
ध्यायतः किं न मन्युस्ते प्राप्ते काले विवर्धते ।
भीमसेनं हि कर्माणि स्वयं कुर्वाणमच्युतं ॥ २१ ॥
सुखार्हं दुःखितं दृष्ट्वा कस्मान्मन्युर्न वर्धते ।
सत्कृतं विविधैर्यानैर्वस्त्रैरुच्चावचैस्तथा ॥ २२ ॥
तं ते वनगतं दृष्ट्वा कस्मान्मन्युर्न वर्धते ।
अयं कुरून्रणे सर्वान्हंतुमुत्सहते प्रभुः ॥ २३ ॥
त्वत्प्रतिज्ञां प्रतीक्षंस्तु सहतेऽयं वृकोदरः ।
योऽर्जुनेनार्जुनस्तुल्यो द्विबाहुर्बहुबाहुना ॥ २४ ॥
शरावमर्दे शीघ्रत्वात्कालांतकयमोपमः ।
यस्य शस्त्रप्रतापेन प्रणताः सर्वपार्थिवाः ॥ २५ ॥

---

१ गृहविहीन, अनिकेतन रहाणें हें एक यतीचें व्रत असतें. [करतलभिक्षा तरुतलवासः-शंकराचार्य]. २ गृहस्थाश्रमी लोक. ३ सत्वशील, पौष्टिक. ४,५,६ इष्ट अन्नांनीं सहस्र नांवाचीं पात्रें सत्कारिलींस, सहस्र=अन्न वाढण्याचें पात्र विशेष. सर्वकामैः-काम्य अशा सर्व अन्नांनीं. ७ मनोरथ. ८ सुंदर कुंडलें धारण करणारे. ९ मिष्ट अन्नांनीं. १० आचारी. ११ वन्य अन्नानें. १२ राग. १३ न चुकणारा, कधींही न चुकलेला. १४ कां? कसा? १५ अवर्णनीय, अत्युत्कृष्ट. १६ मारण्याला उत्कंठित झाला आहे. १७ तुझ्या प्रतिज्ञेकडे लक्ष देऊन. १८ सहस्रार्जुन, याला सहस्र बाहू होते. १९ बाणपातप्रसंगीं.

यज्ञे तव महाराज ब्राह्मणानुपतस्थिरे ।
तमिमं पुरुषव्याघ्रं पूजितं देवदानवैः ॥ २६ ॥
ध्यायंतमर्जुनं दृष्ट्वा कस्माद्राजन्न कुप्यसि ।
दृष्ट्वा वनगतं पार्थमदुःखार्हं सुखोचितं ॥ २७ ॥
न च ते वर्धते मन्युस्तेन मुह्यामि भारत ।
यो देवांश्च मनुष्यांश्च सर्पांश्चैकरथोजयत् ॥ २८ ॥
तं ते वनगतं दृष्ट्वा कस्मान्मन्युर्न वर्धते ।
यो यानैरद्भुताकारैर्हयैर्नागैश्च संवृतः ॥ २९ ॥
प्रसह्य वित्तान्यादत्त पार्थिवेभ्यः परंतप ।
क्षिपत्येकेन बाणेन पंचबाणशतानि यः ॥ ३० ॥
तं ते वनगतं दृष्ट्वा कस्मान्मन्युर्न वर्धते ।
श्यामं बृहंतं तरुणं चर्मिणामुत्तमं रणे ॥ ३१ ॥
नकुलं ते वने दृष्ट्वा कस्मान्मन्युर्न वर्धते ।
दर्शनीयं च शूरं च माद्रीपुत्रं युधिष्ठिर ॥ ३२ ॥
सहदेवं वने दृष्ट्वा कस्मात्क्षमासि पार्थिव ।
नकुलं सहदेवं च दृष्ट्वा ते दुःखितावुभौ ॥ ३३ ॥
अदुःखार्हौ मनुष्येन्द्र कस्मान्मन्युर्न वर्धते ।
द्रुपदस्य कुले जातां स्नुषां पांडोर्महात्मनः ॥ ३४ ॥
धृष्टद्युम्नस्य भगिनीं वीरपत्नीमनुव्रतां ।
मां वै वनगतां दृष्ट्वा कस्मात्क्षमासि पार्थिव ॥ ३५ ॥
नूनं च तव वै नास्ति मन्युर्भरतसत्तम ।
यत्ते भ्रातॄंश्च मां चैव दृष्ट्वा न व्यथते मनः ॥ ३६ ॥

---

१ ब्राह्मणांचा सत्कार केला, त्यांची ऊठबस केली. २ विचारांत पडलेला. ३ उत्तम रथी. ४ वाहनें. ५ हत्ती. ६ बळानें. ७ घेता झाला. ८ बळकट, बांधेसूद ९ खड्गचर्मधरांमध्यें, चर्म=ढाल. १० पतिव्रता.

न [1]निर्मन्युः क्षत्रियोऽस्ति लोके निर्वचनं[2] स्मृतं ।
तदद्य त्वयि पश्यामि क्षत्रिये विपरीत[3]वत् ॥ ३७ ॥
यो न दर्शयते तेजः क्षत्रियः काल आगते ।
सर्वभूतानि तं पार्थ सदा परिभवन्त्यु[4]त ॥ ३८ ॥
तत्त्वया न क्षमा कार्या शत्रून्प्रति कथंचन ।
ते[5]जसैव हि ते शक्या निहंतु नात्र संशयः ॥ ३९ ॥
तथैव यः क्षमाकाले क्षत्रियो नोपशाम्यति ।
अप्रियः सर्व भूतानां सोऽमुत्रेह[6] च नश्यति ॥ ४० ॥
तदहं तेजसः कालं तव मन्ये नराधिप ।
धार्तराष्ट्रेषु लुब्धेषु[7] सततं चापकारिषु ॥ ४१ ॥
नहि कश्चित्क्षमाकालो विद्यतेऽद्यकुरून्प्रति ।
तेजसश्चागते काले तेजमुत्स्रष्टुमर्हसि[8] ॥ ४२ ॥
मृदु[9]र्भवत्यनुज्ञांत[10]स्तीक्ष्णादुद्विजंते[11] जनः ।
काले प्राप्ते द्वयं चैतद्यो वेद स महीपतिः ॥ ४३ ॥

---

## युधिष्ठिर प्रतिवचनम्.

### युधिष्ठिर उवाच.

क्रोधो हंता मनुष्याणां क्रोधो भावयिता[12] पुनः ।
इति विद्धि महाप्राज्ञे क्रोध[13]मूलौ भवाभवौ[14] ॥ १ ॥

---

१ क्रोधशून्य, नेभळा. २ सिद्धांत, म्हण. (व्युत्पत्ति असाही अर्थ आहे). ३ उलटें. ४ त्रास देतात. ५ फक्त पराक्रमानेंच. ६ अमुत्र=परलोकीं; इह=या जगांत. ७ लुब्ध=लाभोविष्ठ. ८ बाहेर फेंकण्यास, प्रकट करण्यास; " सहस्रगुणमुत्स्रष्टुमादत्ते हि रसं रविः "—कालिदास. ९ कोणी जरा मऊपणानें वागला, तर लोक त्याच्यावर हुकमत चालवितात व अम्मल गाजवितात; पण तोच जरा कडक असेल, तर लोक त्याच्या वाऱ्यास उभे राहत नाहींत! १० आज्ञाधारक, नम्र. ११ वचकून वागतात, दूर पळतात. १२ उत्पन्न करणारा, भावना आणणारा. १३ क्रोध आहे मूल—उत्पत्तिस्थान—ज्यांचें, असे. १४ उत्कर्ष आणि नाश.

यो हि [1]संहरते क्रोधं [2]भवस्तस्य सुशोभने ।
यः पुनः पुरुषः क्रोधं नित्यं न सहते शुभे ॥ २ ॥
तस्याभावाय[3] भवति क्रोधः परमदारुणः ।
क्रोधमूलो विनाशो हि प्रजानामिह दृश्यते ॥ ३ ॥
तत्कथं मादृशैः[4] क्रोधमुत्सृजेल्लोकनाशनं ॥ ३ ॥
क्रुद्धः पापं नरः कुर्यात्क्रुद्धो हन्याद्गुरूनपि ।
क्रुद्धः परुषया[5] वाचा श्रेयसो[6]ऽप्यवमन्यते[7] ॥ ४ ॥
वाच्यावाच्ये[8] हि कुपितो न प्रजानाति कर्हिचित् ।
नोकार्यमस्ति[9] क्रुद्धस्य नावाच्यं विद्यते तथा ॥ ५ ॥
हिंस्यात्[10]क्रोधादवध्यांस्तु वध्यान्संपूजयीत च ।
आत्मानमपि च क्रुद्धः प्रेषयेद्[11]यमसादनं[12] ॥ ६ ॥
एतान्दोषान्प्रपश्यद्भिर्जितः क्रोधो मनीषिभिः[13] ।
इच्छद्भिः परमश्रेयं[14] इह चामुत्र चोत्तमं ॥ ७ ॥
तं क्रोधं वर्जितं धीरैः कथमस्मद्विधः[15]श्चरेत् ।
एतद्द्रौपदि संधार्य[16] न मे मन्युः प्रवर्धते ॥ ८ ॥
आत्मानं च परांश्चैव त्रायते महतो भयात् ।
क्रुध्यंतम[17]प्रतिक्रुध्यन्[18] द्वयोरेष चिकित्सकः ॥ ९ ॥
मूढो यदि क्लिश्यमानः क्लिश्यतेऽशक्तिमान्नरः ।
बलीयसां[19] मनुष्याणां त्यजत्यात्मानमात्मना ॥ १० ॥

---

१ आंवरतो. २ त्याचा खरा संसार, म्ह. त्याच्या जन्माचें खरें सार्थक्य झालें. ३ नाशार्थ. ४ माझ्यासारखा (मनुष्य). ५ कठोर. ६ श्रेष्ठ लोकांनां. ७ अवमानितो. ८ काय बोलावें व काय न बोलावें हें सुद्धां क्रोधवश मनुष्याच्या मुळींच ध्यानांत राहत नाहीं. ९ रागावलेल्या मनुष्याला 'अकार्य' 'अवाच्य' कोणतेंच नाहीं. तो वाटेल तें करील व वाटेल तें बोलेल. १० मारील. ११ पाठवील. १२ यमाच्या घरीं. १३ थोर, मनःसंयमी पुरुषांनीं. १४ कल्याण. १५ आमच्या सारखा. १६ मनांत बाळगून. १७ रागावलेल्यावर परत न रागावणारा. १८ अपकार नाहींसा करणारा. १९ बलिष्ठ माणसांनां त्रास देऊं पाहतो.

तस्यात्मानं संत्यजतो लोका नश्यंत्यनात्मनः ।
तस्माद्द्रोपचशक्तस्य मन्योर्नियमनं स्मृतं ॥ ११ ॥
तस्माच्छश्वत्यजक्रोधं पुरुषः सम्यगाचरन् ।
श्रेयान्स्वधर्मानपगो न क्रुद्ध इति निश्चितं ॥ १२ ॥
यदि सर्वमबुद्धीनामतिक्रांतमचेतसां ।
अतिक्रमो मद्विधस्य कथं स्वित्स्याददनिंदिते ॥ १३ ॥
यदि न स्युर्मानुषेषु क्षमिणः पृथिवीसमाः ।
न स्यात्संधिर्मनुष्याणां क्रोधमूलो हि विग्रहः ॥ १४ ॥
अभिषक्तो ह्यभिषजेदाहन्याद्गुरुणा हतः ।
एवं विनाशो भूतानामधर्मः प्रथितो भवेत् ॥ १५ ॥
आक्रुष्टः पुरुषः सर्वं प्रत्याक्रोशेदनंतरं ।
प्रतिहन्याद्धतश्चैव तथा हिंस्याच्च हिंसितः ॥ १६ ॥
हन्युर्हि पितरः पुत्रान्पुत्राश्चापि तथा पितॄन् ।
हन्युश्च पतयो भार्याः पतीन्भार्यास्तथैव च ॥ १७ ॥
एवं संकुपिते लोके जन्म कृष्णे न विद्यते ।
प्रजानां संधिमूलं हि जन्म विद्धि शुभानने ॥ १८ ॥

---

१ देह त्याग केल्यानें त्याला इहलोक किंवा परलोक कोणचेंहि लाभत नाहीं. तेव्हां अशक्तानें क्रोध टाकून आपलें व दुसऱ्याचें रक्षण करावें हें उत्तम असा आशय. २ आला. ३ सांगितलें आहे. मूळ अर्थ 'वेदांत किंवा स्मृतींत सांगितलेलें आम्हांला आठवतें' असा आहे. ४ स्वधर्म सोडणारा [अपगः]=स्वधर्म या शब्दाचा समास होऊनही द्वीतीयेचा प्रत्यय राहिला आहे. हा आर्ष प्रयोग आहे. ५ क्षमा, आर्जव इत्यादि सर्व गुण. ६ लंघिलें, सोडलें. ७ माझ्या सारखा कसा बरें अतिक्रम करील. ८ स्विद् हें प्रश्नार्थी अव्यय आहे. ९ मनुष्य जातांत १० क्षमावान पुरुष. ११ एकी. १२ भेद, भांडण. १३ तापित. १४ तापवील. १५ गुरुणापि हतः तं आहन्यात् किमुत अन्यं इति भावः १६ विनाश आणि अधर्म फैलावतील. १७ वाणीनें ताडण केलेला. १८ हल्ला केला गेलेला. १९ ताडित. २० क्रोधाच्या प्राबल्यामुळें पूर्ववयांतच पतिपत्नी यानीं एकमेकांचा नाश केल्यानें उत्पत्ति थांबेल !

ताः क्षिपेरन्प्रजाः सर्वाः क्षिप्रं द्रौपदि तादृशे ।
तस्मान्मन्युर्विनाशाय प्रजानामभवाय च ॥ १९ ॥
यस्मात्तु लोके दृश्यंते क्षमिणः पृथिवीसमाः ।
तस्माज्जन्म च भूतानां भवश्च प्रतिपद्यते ॥ २० ॥
क्षन्तव्यं पुरुषेणेह सर्वापत्सु सुशोभने ।
क्षमावतो हि भूतानां जन्म चैव प्रकीर्तितं ॥ २१ ॥
आक्रुष्टस्ताडितः क्रुद्धः क्षमते यो बलीयसा ।
यश्च नित्यं जितक्रोधो विद्वानुत्तमपूरुषः ॥
प्रभाववानपि नरस्तस्य लोकाः सनातनाः ॥ २२ ॥
क्षमा यज्ञः क्षमा धर्मः क्षमा वेदाः क्षमा श्रुतम् ।
य एतदेवं जानाति स सर्वं क्षंतुमर्हति ॥ २३ ॥
क्षमा ब्रह्म क्षमा सत्यं क्षमा भूतं च भावि च ।
क्षमा तपः क्षमा शौचं क्षमयेदं धृतं जगत् ॥ २४ ॥
क्षमा तेजस्विनां तेजः क्षमा ब्रह्म तपस्विनां ।
क्षमा सत्यं सत्यवतां क्षमा यज्ञः क्षमा शमः ॥ २५ ॥
तां क्षमां तादृशीं कृष्णे कथमस्मद्विधस्त्यजेत् ।
यदा हि क्षमते सर्वं ब्रह्म संपद्यते तदा ॥ २६ ॥
पितामहः शांतनवः शमं संपूजयिष्यति ।
कृष्णश्च देवकीपुत्रः शमं संपूजयिष्यति ॥ २७ ॥
आचार्यो विदुरः क्षत्ता शममेव वदिष्यतः ।

---

१ नाश पावतील, चहूंकडे जातील. २ क्रोधाविष्ट राजा झाला असतां. ३ नाश, अवदशा. ४ क्षमावान् पुरुषापासून. ५ जसा अशक्त मनुष्य बलवानानें ताडिला गेला तरी क्षमा करितो तसा प्रभाववान् असून सुद्धां जर पुरुष क्षमा करील तर सर्व श्रेष्ठ लोकांची त्यास प्राप्ति होईल. ६ ब्रह्म हें क्षमेनें प्राप्य होय. ७ संचित तप रक्षिणारी क्षमा होय. ८ भविष्यत्तपाचें रक्षण करणारी क्षमा. ९ दासी पुत्र ( विदुर हा व्यासापासून अंबिकेच्या दासीला झालेला पुत्र होय ).

कृपश्च संजयश्चैव शममेव वदिष्यतः ॥ २८ ॥
सोमदत्तो युयुत्सुश्च द्रोणपुत्रस्तथैव च ।
पितामहश्च नो व्यासः शमं वदति नित्यशः ॥ २९ ॥
एतैर्हि राजा [1]नियतं चोद्यमा[2]नः शमं प्रति ।
[3]राज्यं दातेति मे बुद्धिर्नचैल्लोभान्नशिष्यति ॥ ३० ॥
कालोऽयं दारुणः प्राप्तो भारतानामभूतये ।
निश्चितं[4] मे सदै[5]वैतत्पुरस्तादपि भाविनि ॥ ३१ ॥
सुयोधनो नार्हतीति क्षमामेत्रं[6] न [7]विंदति ।
अर्हस्[8]तत्राहमित्येवं तस्मान्मां विंदते क्षमा ॥ ३२ ॥
एतदात्म[9]वतां वृत्तमेष धर्मः सनातनः ।
क्षमा चैवानृशस्यं च तत्कर्तास्म्यहमंजसा ॥ ३३ ॥

# कैरातीयम्.

[ पांडव वनांत असतां व्यासांच्या सांगण्यावरून अर्जुन हिमाचलाचे ठिकाणीं गेला व दिव्य अस्त्रांची प्राप्ति करून घेण्यासाठीं त्यानें उग्र तपश्चर्या आरंभिली. त्याची ती प्रखर तपश्चर्या पाहून तेथील ऋषिगण शंकराकडे गेले व सांगूं लागले कीं " येथें एक उग्र असा तापसी आला आहे व त्याचे तपानें आम्हांस त्रास होईल कीं काय अशी भीति वाटते ". शंकर म्हणाले " भिण्याचें कांहीं कारण नाहीं. मी त्याचा बंदोबस्त करितों ". असें आश्वासन देऊन शंकरानें किराताचें रूप धारण केलें व ज्या ठिकाणीं अर्जुन तप करित होता तेथें आला, तों तेथें मूक नांवाच्या एका राक्षसानें वराहाचें रूप धारण करून अर्जुनावर चाल केली होती. त्यास पांहतांच अर्जुनानें चाप सज्ज करून त्यास मारण्याकरितां एक बाण सोडला. तत्क्षणींच किरातरूपी शंकरानेंही त्याच्यावर बाण सोडला. दोघांचेही बाण एकदम त्या वराहाचे शरीरास लागून तो गतप्राण झाला. एका हलकट किरातानें-भिल्लानें-आपल्या बरोबर बाण सोडिला हें पाहून अर्जुनास राग आला व त्यानें

---

१ खास, खरोखर. २ आग्रह केला जाणारा. ३ राज्य देईल असें मला वाटतें. ४,५. असें मीं पूर्वीपासूनच ठरवून ठेविलें आहे. ६,७. वर सांगितल्याप्रमाणें दुर्योधन राज्याप्रत योग्य नाहीं म्हणून त्यास क्षमा मिळत नाहीं. ८ मी राज्यास योग्य आहें म्हणून क्षमा माझा आश्रय करिते. ९ हा आत्मवानांचा ( तत्ववेत्त्यांचा ) मार्ग होय.

त्या किरातास मृगयाधर्माचे विरुध्द वर्तन करण्याबद्दल युद्ध करण्यास आव्हान केलें. युध्द सुरू झालें व अर्जुनाचें त्याच्या पुढें कांहीं चालेनासें झालें. त्याचें अमोघ असें गांडीवही उपयोगीं पडेना. शेवटीं अर्जुन मूर्छित होऊन पडला. सावध झाल्यावर अर्जुनानें शंकराची मूर्ति करून त्याची पूजा केली. परंतु चमत्कार असा झाला कीं त्यानें शंकरावर म्हणून घातलेल्या माळा किराताचे शरीरावर झळकूं लागल्या. तें पहातांच शंकराची अर्जुनास एकदम ओळख पटली व किरातरूपी अशा शंकरास तो शरण गेला. नंतर शंकर त्याचे पराक्रमानें सुप्रसन्न झाला व त्यानें त्यास पाशुपतास्त्र नांवाचें प्रचंड अस्त्र दिलें.]

## वैशंपायन उवाच.

युधिष्ठिरनियोगात्[1]स[2] जगामामितविक्रमः ।
शक्रं सुरेश्वरं द्रष्टुं देवदेवं च शंकरं ॥ १ ॥
दिव्यं तद्धनुरादाय खड्गं च कनकत्सरुं[3] ।
महाबलो महाबाहुरर्जुनः कार्यसिद्धये ॥ २ ॥
दिशं ह्युदीचीं[4] कौरव्यो हिमवच्छिखरं प्रति ।
ऐन्द्रिः[5] स्थिरमना राजन् सर्वलोकमहारथः ॥ ३ ॥
त्वरया परया[6] युक्तस्तपसे धृतनिश्चयः ।
वनं कंटकितं घोरमेकमेवान्वपद्यत ॥ ४ ॥
नानापुष्पफलोपेतं नानापक्षिनिषेवितं ।
नानामृगगणाकीर्णं सिद्धचारणसेवितं ॥ ५ ॥
ततः प्रयाते कौंतेये वनं मानुषवर्जितं ।
शंखानां पटहानां च शब्दः समभवद्दिवि ॥ ६ ॥
पुष्पवर्षं चानुमहन्निपपात महीतले ।
मेघजालं च विततं छादयामास सर्वतः ॥ ७ ॥
सोऽतीत्य वनदुर्गाणि संनिकर्षे महागिरेः ॥
शुशुभे हिमवत्पृष्ठे वसमानोऽर्जुनस्तदा ॥ ८ ॥

---

१ आज्ञेवरून. २ अर्जुन. ३ सुवर्ण मुठीचें. ४ उत्तर. ५ इंद्रपुत्र, अर्जुन. ६ मोठ्या. ७ पांचला. ८ नगाऱ्यांचा. ९ आकाशांत. १० पुष्पवृष्टि. ११ विस्तृत. १२ शेजारीं, जवळ.

तत्रापश्यद्द्रुमान्फुल्लान्विहगैर्वल्गुनादितान् ।
नदीश्च विपुलावर्ता वैदूर्यविमलप्रभाः ॥ ९ ॥
हंसकारंडवोद्गिताः सारसाभिरुतास्तथा ।
पुंस्कोकिलरुताश्चैव क्रौंचबर्हिणनादिताः ॥ १० ॥
मनोहरवनोपेतास्तस्मिन्नतिरथोऽर्जुनः ।
पुण्यशीतामलजलाः पश्यन्प्रीतमनाऽभवत् ॥ ११ ॥
रमणीये वनोद्देशे रममाणोऽर्जुनस्तदा ।
तपस्युग्रे वर्तमान उग्रतेजा महामनाः ॥ १२ ॥
दर्भचीरं निवस्याथ दण्डाजिनविभूषितः ।
शीर्णं च पतितं भूमौ पर्णं समुपयुक्तवान् ॥ १३ ॥
पूर्णे पूर्णे त्रिरात्रे तु मासमेकं फलाशनः ।
द्विगुणेन हि कालेन द्वितीयं मासमत्ययात् ॥ १४ ॥
तृतीयमपि मासं स पक्षेणाहारमाचरन् ।
चतुर्थेत्वथ संप्राप्ते मासे भरतसत्तमः ॥ १५ ॥
वायुभक्षो महाबाहुरभवत्पांडुनंदनः ।
ऊर्ध्वबाहुर्निरालंबः पदांगुष्ठाग्रधिष्ठितः ॥ १६ ॥
सदोपस्पर्शनाच्चास्य बभूवुरमितौजसः ।
विद्युदंभोरुहनिभा जटास्तस्य महात्मनः ॥ १७ ॥
ततो महर्षयः सर्वे जग्मुर्देवं पिनाकिनं ।
विवेदयिषवः पार्थं तपस्युग्रे समास्थितं ॥ १८ ॥

१ वृक्ष. २ पक्ष्यांच्या मधुर किलकिलाटानं गजबजलेले. ३ विपुलाः आवर्ताः यासां ताः-आवर्त-भोवरा. तेथील नद्यांनां मोठमोठे भोंवरे होते. ४ वैदूर्य हें एक प्रकारचें रत्न आहे. ५ कारंडव-बदक. ६ दर्भाचें वस्त्र. ७ नेसून. ८ हरिणाचे कातड्यानें सुशोभित झालेला. ९ गळलेलें. १० सेवन करणारा. ११ पंधरावड्यानें एकदा खाऊन. १२ निराश्रय. (गते पुंजे यशः पुञ्जे निरालंबा सरस्वती-सुभाषित). १३ पायांच्या आंगठ्याच्या टोंकावर उभा राहणारा. १४ सदैव स्नान करण्यानें १५ विजेप्रमाणें चकाकणाऱ्या कमलाप्रमाणें प्रसन्न. १६ जाणच्याची इच्छा करणारे.

तं प्रणम्य महादेवं शशंसुः पार्थकर्म तत् ।
एष पार्थो महातेजा हिमवत्पृष्ठमास्थितः ॥ १९ ॥
उग्रे तपसि दुष्पारे स्थितो धूमाययन्दिशः ।
तस्य देवेश न वयं विद्मः सर्वे चिकीर्षितं ॥ २० ॥
संतापयति नः सर्वानसौ साधु निवार्यतां ।
तेषां तद्वचनं श्रुत्वा मुनीनां भावितात्मनां ॥ २१ ॥
उमापतिर्भूतपतिर्वाक्यमेतदुवाच ह ।

## महादेव उवाच.

न वो विषादः कर्तव्यः फाल्गुनं प्रति सर्वशः ॥ २२ ॥
शीघ्रं गच्छत संहृष्टा यथागतमतन्द्रिताः ।
अहमस्य विजानामि संकल्पं मनसि स्थितं ॥ २३ ॥
नास्य स्वर्गस्पृहा काचिन्नैश्वर्यस्य तथायुषः ।
यत्तस्य कांक्षितं सर्वं तत्करिष्येऽहमद्य वै ॥ २४ ॥

## वैशंपायन उवाच.

तच्छ्रुत्वा शर्ववचनमृषयः सत्यवादिनः ।
प्रहृष्टमनसो जग्मुर्यथास्वान्पुनरालयान् ॥ २५ ॥

## वैशंपायन उवाच.

गतेषु तेषु सर्वेषु तपस्विषु महात्मसु ।
पिनाकपाणिर्भगवान्सर्वपापहरो हरः ॥ १ ॥
कैरातं वेषमास्थाय कांचनद्रुमसंनिभं ।
विभ्राजमानो विपुलो गिरिर्मेरुरिवापरः ॥ २ ॥

---

१ धूमवतीः इव कुर्वन्. २ चिंतित, हेतु. ३ पवित्र अंतःकरणाचें. ४ विनदिक्कत. ५ शिव. ६ शंकर. पिनाक–(शंकराचें) धनुष्य. ७ पारध्याचा. ८ घेऊन. ९ सुवर्णाच्या वृक्षासारखा दिसणारा. १० प्रकाशमान.

श्रीमद्धनुरुपादाय[1] शरांश्चाशीविषोपमान्[2] ।
निष्पपात महावेगो दहनो[3] देहवानिव ॥ ३ ॥

देव्या सहोमया श्रीमान् समानव्रतवेषया ।
नानावेषधरैर्हृष्टैर्भूतैरनुगतस्तदा ॥ ४ ॥

किरातवेषसंछन्नः[5] स्त्रीभिश्चापि सहस्रशः ॥
अशोभत तदा राजन्स देशोऽतीव भारत ॥ ५ ॥

क्षणेन तद्वनं सर्वं निःशब्दम्[6]भवत्तदा ।
नादः प्रस्रवणानां[7] च पक्षिणां चाप्युपारमत् ॥ ६ ॥

स संनिकर्षम्[9]आगम्य पार्थस्याक्लिष्टकर्मणः[10] ।
मूकं नाम दनोः[11] पुत्रं ददर्शाद्भुतदर्शनं ॥ ७ ॥

वाराहं[12] रूपमास्थाय तर्कयंतम्[13]इवार्जुनं ।
हंतुं परं दीप्यमानं तमुवाचाथ फाल्गुनः ॥ ८ ॥

गांडीवं धनुरादाय शरांश्चाशीविषोपमान् ।
सज्जं धनुर्वरं कृत्वा ज्याघोषेण निनादयन् ॥ ९ ॥

यन्मां प्रार्थयसे[14] हंतुमनागसम्[15]इहागतं ।
तस्मात्त्वां पूर्वम्[16]एवाहं नेताद्य यमसादनं[17] ॥ १० ॥

दृष्ट्वा तं प्रहरिष्यंतं फाल्गुनं दृढधन्विनं[18] ।
किरातरूपी सहसा वारयामास शंकरः ॥ ११ ॥

---

१ जवळ लटकाऊन. २ सर्पांसारखे ३ अग्नि. ४ कैरात धर्माला साजेसा वेष जिनें घेतला आहे अशा. ५ भिल्लाच्या वेषांत स्वतःचें रूप झांकलेला. ६ शून्य, सामसूम. ७ ओढयांचा. ८ थांबला, बंद पडला. ९ शेजार, सान्निध्य. १० सहज काम करणारा ( न क्लिष्टं कर्म यस्य स अक्लिष्टकर्मा ) ११ दनूचा मुलगा, दानव, राक्षस. १२ वराहाचें. १३ अर्जुनाला उद्देशून, अर्जुनाकडे. १४ इच्छितोस. १५ अनागसम्=निरपराधिनम्=आगस् ( न. )=अपराध. १६ अगोदरच, आगाऊच. १७ यमाचे घरीं. १८ दृढं धनुः यस्य स दृढधन्वा तम्.

